**<u>पेट्रोल/डिझेल/पंपाचे/केरोसीन व इतर पेट्रोलियम पदार्थांच्या तसेच जीवनावश्यक वस्तू कायदा,१९५५ च्या कार्यकक्षेत येणाऱ्या जीवनावश्यक वस्तूंच्या तपासण्या करण्यासाठी राज्यस्तरीय दक्षता पथकाची फेररचना.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: पेट्रोल १२१६/प्र.क्र. २१९/नापु-२४**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १० नोव्हेंबर,२०१६.

**<u>वाचा</u>** : १) शासन निर्णय क्रमांक पेट्रोल १५०३/प्र.क.११८६/नापु-२४, दिनांक ११ ऑगस्ट,२००५
२) शासन निर्णय क्रमांक पेट्रोल १५०३/प्र.क्र.११८६/नापु-२४, दिनांक ३० ऑगस्ट,२००५
३) शासन निर्णय क्रमांक पेट्रोल १००६/प्र.क्र.२१३३/नापु-२४, दिनांक १९ मे,२००६
४) शासन निर्णय क्रमांक पेट्रोल १००७/प्र.क्र.२८६७/नापु-२४, दिनांक १३ सप्टेंबर,२००७
५) शासन निर्णय क्रमांक पेट्रोल १००७/प्र.क्र.२८६७/नापु-२४, दिनांक ६ जून, २००९
६) शासन निर्णय क्रमांक पेट्रोल १००७/प्र.क्र.२८६७/नापु-२४, दिनांक २६ ऑगस्ट,२००९
७) शासन निर्णय क्रमांक पेट्रोल १००७/प्र.क्र.२८६७/नापु-२४, दिनांक २८ डिसेंबर,२०१०

**<u>प्रस्तावना</u> :-**

पेट्रोल व डिझेलमध्ये केरोसीन तसेच इतर पेट्रोलियम उपपदार्थांच्या होणाऱ्या भेसळीस आळा घालण्यासाठी व त्यापासून होणारी ग्राहकांची फसवणूक थांबविण्यासाठी राज्यातील पेट्रोल/डिझेल पंप, केरोसीन व इतर पेट्रोलियम पदार्थांचे डिलर/विक्रेते यांच्या व्यवहाराच्या तपासण्या करण्यासाठी राज्य शासनाने दिनांक ११/८/२००५ व ३०/८/२००५ या दोन शासन निर्णयान्वये राज्य, विभाग व जिल्हास्तरीय दक्षता पथकाचे गठन केले आहे. त्यानंतर दिनांक ६ जून, २००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर दक्षता पथकाचे पुनर्गठन करण्यात आले होते. तसेच दिनांक २८ डिसेंबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये सदरील समितीची फेररचना करण्यात आली होती. त्यामध्ये कालानुरुप पुन्हा फेररचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

पेट्रोलियम पदार्थांशी निगडीत अनियमिततांना पायबंद घालण्याच्या दृष्टीने गठीत करण्यात आलेल्या दक्षता पथका संदर्भात शासन निर्णय क्रमांक पेट्रोल १००७/प्र.क्र.२८६७/नापु-२४, दिनांक ६ जून, २००९ या आदेशान्वये पुनर्गठीत करण्यात आलेल्या तसेच दिनांक २८डिसेंबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये फेररचना करण्यात आलेल्या राज्यस्तरीय दक्षता पथकाची पुनःश्च फेररचना पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

| | **राज्यस्तरीय दक्षता पथक** |
|---|---|
| पदसिध्द पथक प्रमुख | नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई |
| सदस्य | पोलीस आयुक्तालय असलेल्या ठिकाणी सहायक पोलिस आयुक्त व अन्य ठिकाणी पोलीस उप अधिक्षक |
| सदस्य | उपायुक्त (पुरवठा), कोकण विभाग |
| सदस्य | उपनियंत्रक शिधावाटप (अंमलबजावणी) |
| सदस्य | उपनियंत्रक / सहायक नियंत्रक, वैधमापन शास्त्र, मुंबई महानगर विभाग |
| सदस्य | उपव्यवस्थापक राज्यस्तरीय समन्वयक तेल उद्योग, मुंबई |
| सदस्य | जिल्हा पुरवठा अधिकारी (अचानक तपासणीसाठी वेळेवर आदेशित केलेले) |
| सदस्य | जिल्हा पुरवठा अधिकारी, (अचानक तपासणीसाठी वेळेवर आदेशित केलेले) |

२. राज्यस्तरीय दक्षता पथकास पेट्रोलियम पदार्थाच्या अनियमिततांना आळा घालण्याच्या दृष्टीने कारवाई करण्याबरोबरच जीवनावश्यक वस्तू अधिनियम, १९५५ अंतर्गत येत असलेल्या सर्व जीवनावश्यक वस्तूसंदर्भात आढळून आलेल्या अनियमिततांना पायबंद घालण्यासाठी नियमानुसार आवश्यक असलेली कारवाई करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. उपरोक्त आदेश तात्काळ अंमलात येतील.

४. विभागीय व जिल्हास्तरीय दक्षता पथकाच्या संरचनेत कोणताही बदल करण्यात आलेला नाही. त्याचप्रमाणे दक्षता पथकांच्या कार्यकक्षा, कर्तव्य अधिकार हे दिनांक १३/९/२००७ च्या शासन निर्णयाप्रमाणेच राहतील. त्याचप्रमाणे परिच्छेद २ मध्ये राज्यस्तरीय दक्षता पथकास देण्यात आलेले अधिकार विभागीय व जिल्हास्तरीय दक्षता पथकास देखील बहाल करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११६१४३१५२९३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhaskar Baburao Patil

Digitally signed by Bhaskar Baburao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb17268641691acddf048e6aa2150f79b022d09a6c745e92beb9baeed480e62, cn=Bhaskar Baburao Patil
Date: 2016.12.05 12:37:05 +05'30'

**(भा.बा. पाटील)**
शासनाचे उपसचिव,

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त,

२) सर्व जिल्हाधिकारी
३) गृह विभाग (कार्यासन विशा-४ व पोल-९), मंत्रालय, मुंबई
४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र  राज्य, मुंबई
५) पोलीस आयुक्त, मुंबई
६) नियंत्रक, वैधमापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) नियंत्रक, शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई
८) सर्व उपायुक्त (पुरवठा)
९) सर्व अपर जिल्हाधिकारी
१०) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
११) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१२) राज्यस्तरीय समन्वयक तेल उद्योग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१३) खाजगी सचिव, मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१४) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१५) प्रधान सचिव , अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
१६) पोलीस उप आयुक्त (अंमलबजावणी) गुन्हे शाखा, गुन्हा अन्वेषण विभाग, मुंबई
१७) पोलीस उप महानिरीक्षक, कायदा व सुव्यवस्था, मुंबई
१८) उपसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) उपसचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१) उप आयुक्त (विक्रीकर), विक्रीकर आयुक्तांचे कार्यालय, मुंबई
२२) सर्व अधिकारी (प्रधान सचिव वगळून) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
२३) सर्व कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
२४) निवड नस्ती  (कार्यासन नापु-२४)